राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पाअंतर्गत निर्णय
आधार प्रणाली तयार करण्यास प्रशासकीय
मंजूरी देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जलवि-३४२२/प्र.क्र.१०/पापु-१५**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल,
क्रॉफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, नवीन मंत्रालय, मुंबई-४०० ००१
तारीख: ११ जानेवारी,२०२२

संदर्भ:- १)पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग शासन निर्णय क्र.जलवि-२०१५/प्र.क्र.१२०/पापु-१५ दि.१०.१०.२०२०

०२) आयुक्त भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा पुणे यांचे पत्र क्र.भूसवियं/राजविप्र/डिएसएस/प्र.मान्यता/२०२१/६०६/दि.२७.१२.२०२१

**प्रस्तावना -**

जागतिक बँक अर्थसहाय्यीत राष्ट्रीय जल विज्ञान प्रकल्पांतर्गत भूजल वापराचे पर्यवेक्षण करण्यासाठी निर्णय आधार प्रणाली तयार करण्यास (अंदाजित खर्च ४,००,००,०००/-) आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना सादर केलेल्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

२. जागतिक बँक अर्थसहाय्यीत राष्ट्रीय जल विज्ञान प्रकल्पांतर्गत निर्णय आधार प्रणाली तयार करण्यासाठी अंदाजित खर्च रु.४,००,००,०००/- च्या मर्यादेत पुढील अटींच्या अधीनतेने प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

३. प्रस्तुत प्रयोजनासाठीचा खर्च राष्ट्रीय जल विज्ञान प्रकल्पांतर्गत सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात व तद्नंतर वेळोवेळी केंद्र शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या तरतुदीमधून भागविण्यात येईल.

४. सदर यंत्रणा तयार करण्याचे काम प्रगतीपथावर असताना आयुक्त,भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल अभिलेख्यात जतन करावा.

५. सदरील निर्णय आधार प्रणाली करण्यासाठीच्या खर्चाबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता आयुक्त, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा यांनी घ्यावी.

६. उपरोक्त खर्च राष्ट्रीय जल विज्ञान प्रकल्पांतर्गत उपलब्ध तरतूदीतून खर्ची टाकण्यात यावा.

७. महाराष्ट्र सुदुर संवेदन उपयोजन केंद्र नागपूर या नोडल एजन्सी मार्फत खरेदी करताना उद्योग,उर्जा व कामगार विभागाच्या/ शासनाच्या खरेदी धोरणाच्या तरतूदीचे पालन करण्यात यावे.

८. राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पाच्या अंमलबजावणी संदर्भातील सुधारीत प्रशासकीय मान्यते बाबतचा शासन निर्णय दि.१० नोव्हेंबर, २०२० मधील अटी व शर्तींचे पालन करावे.

९. प्रस्तावित सामंजस्य करारनाम्यामध्ये तंटा निवारणसाठी लवाद अधिनियमानुसार लवादाची नेमणूक करण्याऐवजी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा आणि MRSAC यामधील तंटा निवारणासाठी प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, महाराष्ट्र शासन यांचा निर्णय अंतिम राहिल अशी सुधारणा करण्याच्या अधिनतेने सामंजस्य करारनामा करण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

१०. **सदर निर्णय आधार प्रणाली तयार करण्याचे काम राष्ट्रीय जलविज्ञान प्रकल्पांतर्गत उपलब्ध निधीतून घेण्यात असल्याने व त्यासंबधीच्या कृती आराखड्यात नमुद मर्यादेत घेण्यात येत असल्याने, त्याचप्रमाणे सदर कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देय राहणार नाही याची अंमलबजावणी यंत्रणांनी कटाक्षाने नोंद घ्यावी**.

११. वित्तीय विभाग शासन निर्णय दि.१७/०४/२०१५,वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ भाग पहिला उपविभाग-२, महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम,१९६५ अंतर्गत प्रदान केलेले वित्तीय अधिकार , अनुक्रमांक-४, नियम क्र.७, नुसार प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१११५२२०७५१२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ganesh Nivrutti Pawar

Digitally signed by Ganesh Nivrutti Pawar
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=805bdef8ce1424c02121cece0d20e917ffa1ef512d7e8fa2e49d93adbb5ad352, serialNumber=1325a2533f628572438b5fb711c805de49788678b97015bb0cac990e3b375423, cn=Ganesh Nivrutti Pawar
Date: 2022.01.11 18:10:51 +05'30'

**( गणेश पवार )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई

२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई.
३. मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव. मंत्रालय, मुंबई
५. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव मंत्रालय, मुंबई
६. प्रधान सचिव पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे वरिष्ठ स्विय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
७. आयुक्त, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे
८. संचालक,महाराष्ट्र सुदुर संवेदन उपयोजन केंद्र, नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१०.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, पुणे.
११.महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१२.महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१३.वित्त विभाग (व्यय-३/अर्थसंकल्प १८) मंत्रालय, मुंबई.
१४.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-१), मंत्रालय, मुंबई.
१६.निवड नस्ती (पापु-१५)